**श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा), उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ (माविम) या पदावरील प्रतिनियुक्तीच्या अटी / शर्ती विहीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक-माविम-२०१८/प्र.क्र.८१/का-१०**

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख-२९ जानेवारी, २०१९.

**वाचा :-**

१. महिला व बाल विकास विभाग, आदेश क्रमांक-आस्था-२०१८/प्र.क्र.६२/का-०१, दि.११.०६.२०१८.

**प्रस्तावना :-**

श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांची संदर्भीय आदेशान्वये उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ (माविम), मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली आहे. त्यानुसार श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) ह्या दि.२१.०६.२०१८ रोजी उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ या पदावर रुजू झाल्या आहेत. श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांच्या उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ या पदावरील प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती विहीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांच्या उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ या पदावरील प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती पुढीलप्रमाणे विहित करण्यात येत आहेत.

**(१) प्रतिनियुक्तीचा कालावधी :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा), ह्या दि.२१.०६.२०१८ पासून पुढील चार वर्षासाठी वरील स्वीयेत्तर सेवेत प्रतिनियुक्तीवर असतील. मात्र,

अ) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनास आवश्यक वाटली तर त्यांचा स्वीयेत्तर सेवेचा कालावधी पूर्ण झाल्यावर किंवा पूर्ण होण्यापूर्वी केंद्र व राज्य शासनाच्या यासंदर्भातील नियमानुसार वाढविण्याचा हक्क शासनास असेल.

ब) त्यांच्या सेवेची आवश्यकता शासनास नसेल तर राज्य शासन त्यांना त्यांच्या मुळे सेवेत परत पाठविण्यास सक्षम असेल. मात्र ज्या दिनांकापासून तसे करावयाचे असेल त्याच्या कमीत कमी तीन महिने अगोदर तसे कळविणे आवश्यक राहील.

**(२) वेतन :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) ह्या सदर प्रतिनियुक्तीच्या कालावधीत उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक हे पद धारण करतील. सदर कालावधीत अंतिम वेतन प्रमाणपत्रानुसार (LPC) केंद्र शासनाच्या ७ व्या वेतन आयोगानुसार लेवल-१२ मधील मूळ (६ वा वेतन आयोग-पीबी-०३ ₹५६००-३९२०० ग्रेड पे ₹७६००) वेतनश्रेणीत वेतन घेतील. त्यांच्या वार्षिक वेतनवाढी मंजूर करण्याबाबत महिला आर्थिक विकास महामंडळ ७ व्या वेतन आयोगाच्या आकृतीबंधानुसार उचित कार्यवाही करील.

**(३) प्रतिनियुक्ती भत्ता :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना प्रतिनियुक्तीच्या सदर कालावधीत केंद्र शासनाच्या कार्मिक लोक तक्रारी तथा निवृत्ती वेतन मंत्रालयाचा मूळ कार्यालयीन आदेश क्र.०६/०८/२००९, दि.१७ जून, २०१० व याच विभागाच्या कार्यालयीन आदेश क्र.०२/११/२०१७, दि.२४.११.२०१७ च्या शुध्दीपत्रकातील अटी व शर्तीनुसार १० टक्के प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय राहील.

**वाहतुक भत्ता :-** केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालय, व्यय विभागाच्या कार्यालयीन आदेश क्र.२१/०५/२०१७, दि.०७ जुलै, २०१७ नुसार वाहतुक भत्ता अनुज्ञेय राहील. तथापि, व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ यांना वाहन उपलब्ध करुन दिल्यास वाहतूक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

**प्रवास भत्ता व दैनिक भत्ता :-** केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालय, व्यय विभागाच्या कार्यालयीन आदेश क्र.१९०३०/०१/२०१७-E.IV, दि.१३ जुलै, २०१७ नुसार प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील.

**LTC सुविधा :-** केंद्र शासनाच्या कार्मिक आणि प्रशिक्षण विभागाचा मूळ कार्यालयीन आदेश क्र.३१०११/०४/२००८, दि.२३.०९.२००८ व याच विभागाच्या ३१०/११/०७/२०१३, दि.२६.०९.२०१४ च्या सुधारित आदेशानुसार LTC सुविधा अनुज्ञेय राहील.

Children Education Allowance :- केंद्र शासनाच्या कार्मिक लोक तक्रारी तथा निवृत्ती वेतन मंत्रालयाच्या कार्यालयीन आदेश क्र.२७०१२/०२/२०१७, दि.१६.०७.२०१७ नुसार Children Education Allowance अनुज्ञेय राहील.

तसेच सदर कालावधीत त्यांना जरी त्यांच्या अंतिम वेतन प्रमाणपत्रातही तसे नमूद केले असले तरी त्यांना विशेष वेतन अनुज्ञेय असणार नाही.

**(४) महागाई भत्ता :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत भारतीय राजस्व सेवा अधिकाऱ्यांना ज्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय असेल, त्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय असेल.

**(५) स्थानिक पुरक भत्ता :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना राज्य शासनाच्या नियमांनुसार / आदेशानुसार वेळोवेळी अनुज्ञेय असेल त्या दराने स्थानिक पुरक भत्ता अनुज्ञेय असेल.

**(६) निवासस्थान किंवा त्याऐवजी घरभाडे भत्ता :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांच्या दर्जास साजेसे निवासस्थान महिला आर्थिक विकास महामंडळाकडून उपलबध करुन देण्यात देईल. शासनाच्या नियमानुसार त्यांना भाडेरहित तत्वावर निवासस्थान देय असले, तर त्याचा लाभ श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना घेता येईल.

प्रतिनियुक्तीच्या सदर कालावधीत त्यांच्या ताब्यात शासकीय निवासस्थान नसेल, तर त्यांना केंद्र शासनाच्या नियमानुसार वेळोवेळी अनुज्ञेय असलेला घरभाडे भत्ता अनुज्ञेय असेल.

**(७) पदग्रहण अवधी वेतन आणि बदली प्रवास भत्ता :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना त्यांची स्वीयेत्तर सेवेत प्रतिनियुक्तीने नियुक्ती झाल्यानंतर आणि आणि तेथून परत आल्यानंतर, अशा दोन्ही वेळच्या पदग्रहण अवधी मध्ये त्यांचे वेतन व प्रवासभत्ता, श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) या ज्या शासनाच्या सेवेत असताना स्वीयेत्तर सेवेत गेल्या असतील त्याच शासनाच्या नियमानुसार किंवा स्वीयेत्तर सेवेतून परत आल्यानंतर ज्या शासनाच्या सेवेत जाणार असतील त्या शासनाच्या नियमानुसार महिला आर्थिक विकास महामंडळ यांच्याकडून देण्यात येईल.

**(८) प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कर्तव्यार्थ केलेल्या प्रवासाकरिता प्रवासभत्ता :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना स्वीयेत्तर सेवेत रुजू झाल्यानंतर कर्तव्यार्थ कराव्या लागणाऱ्या प्रवासाकरीता केंद्र शासनाच्या नियमानुसार किंवा महिला आर्थिक विकास महामंडळाच्या नियमान्वये यापैकी ज्याचे नियम अधिक फायदेशिर असतील त्या नियमानुसार प्रवास भत्ता आणि दैनिक भत्ता घेण्याचा विकल्प देऊ शकतील.

**(९) रजा :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत केंद्रिय नागरी सेवा (रजा) नियम, १९७२ लागू असतील. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना नैमित्तिक रजेव्यतिरिक्त इतर प्रकारची रजा मंजूर करण्यास विभागप्रमुख सक्षम असतील. स्वीयेत्तर सेवेच्या कालावधीत अथवा अखेरीस घेतलेल्या रजेच्या कालावधीबद्दल द्यावयाच्या रजा वेतनाचा व स्थानिक पूरक भत्त्यावरील संपूर्ण खर्च महिला आर्थिक विकास महामंडळास सोसावा लागेल.

**(१०) विकलांगता रजेबद्दल रजा वेतन :-** स्वीयेत्तर सेवेत किंवा अशा सेवेमुळे आलेल्या विकलांगतेबद्दल मंजूर करण्यात येणाऱ्या रजेच्या संबंधात, अशा विकलांगता स्वीयेत्तर सेवा संपल्यानंतर उघडकीस आली, तरी सुध्दा रजा वेतन देण्यास महिला आर्थिक विकास महामंडळ जबाबदार असेल.

**(११) रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदाने :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांच्याबाबत रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदान हे विहीत असलेल्या दराने परिगणना करुन संबंधित लेखाशिर्षाखाली जमा करण्याची कार्यवाही महिला आर्थिक विकास महामंडळ करेल. प्रतिनियुक्तीच्या कालावधीतील या रकमांचा भरणा करण्यास विलंब झाल्यास महिला आर्थिक विकास महामंडळ विलंब कालवधीतील अनुज्ञेय दंडात्मक व्याज भरण्यास जबाबदार राहील.

**(१२) नैमित्तिक रजा :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत राज्य शासनाच्या नियमानुसार नैमित्तिक रजा उपभोगता येईल. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत नैमित्तिक रजा मंजूर करण्यास, विभाग प्रमुख सक्षम असतील.

**(१३) रजा प्रवास सवलत :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना केंद्रिय नागरी सेवा (रजा) नियम, १९७२ मधील तरतुदीनुसार रजा प्रवास सवलत मिळविण्याचा हक्क असेल, याबाबतचा खर्च महिला आर्थिक विकास महामंडळ करील. त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत नैमित्तीक रजा वगळता इतर रजा मंजूर करण्यास विभाग प्रमुख सक्षम असल्यामुळे अर्जित रजा कालावधीत रजा सवलत मंजूर करण्यास विभाग प्रमुख सक्षम असतील. त्यांना प्रतिनियुक्तीच्या

कालावधीत नैमित्तिक रजा मंजूर करण्यास सक्षम अधिकारी नैमित्तिक रजेच्या कालावधीतील रजा प्रवास सवलत मंजूर करण्यास सक्षम असेल.

**(१४) वैद्यकीय सवलती :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना महाराष्ट्र राज्य (वैद्यकीय देखभाल) नियम १९६१ मधील तरतुदीनुसार वैद्यकीय सुविधांचा लाभ अनुज्ञेय असेल. त्यावरील खर्च महिला आर्थिक विकास महामंडळ करील. मात्र, केंद्र शासनाच्या कर्मचाऱ्यांसाठी वैद्यकीय सवलती देण्याबाबत वेगळे नियम असतील आणि त्याचा लाभ श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) ह्या घेऊ इच्छित असतील तर प्रतिनियुक्ती कालावधीत त्या नियमाचा लाभ देण्याबाबत विकल्प देण्याचे स्वातंत्र्य त्यांना असेल.

**(१५) भविष्य निर्वाह निधी :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांनी प्रतिनियुक्तीच्या कालावधीत भविष्य निर्वाह निधीची वार्षिक वर्गणी दरमहा त्यांच्या वेतनातून सहायक संचालक (लेखा) मुंबई यांच्यामार्फत GPF लेखाशिर्ष **क्र.८००९००३७१०४** खाली दर्शविण्यात यावा. याबाबतची कार्यवाही महिला आर्थिक विकास महामंडळ करेल. प्रतिनियुक्तीच्या कालावधीतील या रकमांचा भरणा करण्यास विलंब झाल्यास महिला आर्थिक विकास महामंडळ विलंब कालवधीतील अनुज्ञेय दंडात्मक व्याज भरण्यास जबाबदार राहील.

**(१६) विभागीय चौकशी :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांच्याविरुध्द विभागीय चौकशीबाबत केंद्रीय नागरी सेवा (सीसीए) नियम, १९६५ लागू असतील. प्रतिनियुक्तीवर असताना त्यांचेविरुध्द विभागीय चौकशी करावयाची असेल तर त्यांना केंद्र शासन सेवेत प्रत्यावर्तीत करण्यात येईल. यासंबंधी कारवाई अंतर्गत त्यांना शासनाने निलंबित केल्यास निलंबनाच्या कालावधीत त्यांना महिला आर्थिक विकास महामंडळ निर्वाह भत्ता देईल.

**(१७) गट विमा योजना :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांच्या वेतनातून दरमहा जी रक्कम आवश्यक आहे ती रक्कम केंद्र शासकीय कर्मचारी गट विमा योजनेच्या वर्गणीपोटी राज्य शासन दरमहा वसूल करील आणि ही रक्कम सहायक संचालक (लेखा), मुंबई यांच्यामार्फत लेखाशिर्ष क्र.८६५८८६२८०१ खाली दर्शविण्यात येईल. सदर वर्गणी भरण्यास विलंब करण्यात आल्यास विलंब कालावधीत दंडनिय दराने व्याज आकारण्यात येईल. याबाबतची कार्यवाही महिला आर्थिक विकास महामंडळ करेल.

**(१८) मोटार कार :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत वापरासाठी त्यांच्या दर्जाप्रमाणे महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत वाहन उपलब्ध करुन देण्यात येईल. सदर वाहनाचा खाजगी वापर पुढील अटींच्या अधीनतेने त्यांना करता येईल.

अ) वाहनाचा खाजगी वापर दरमहा २५० किलोमीटरहून अधिक होता कामा नये. यासाठी त्यांनी वेळोवेळी विहित करण्यात येणाऱ्या दराने भाडे शासनास द्यावे लागेल.

ब) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-प्रवास-१०९०/प्र.क्र.३२०/९०/सेवा-५, दिनांक १७.१०.१९९० अन्वये निर्गमित केलेल्या आदेशानुसार वाहनाच्या खाजगी वापरास परवानगी असेल. मात्र संबंधित आदेशात वेळोवेळी ज्या सुधारणा केल्या जातील त्या सुधारणाही वाहनाच्या खाजगी वापराबाबत लागू असतील.

**(१९) कर्ज आणि अग्रिम :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत, घर बांधणी अग्रिम, मोटारकार अग्रिम, वैयक्तिक संगणक अंग्रिम मंजूर करण्यास CBIC, New Delhi (Central Board of Indirect Taxes and Customs, New Delhi) सक्षम असेल. याबाबतचे अर्ज महिला व बाल विकास विभागामार्फत CBIC, New Delhi यांच्याकडे मंजूरीसाठी पाठविण्यात यावेत. श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना शासनाकडून यापूर्वीच घरबांधणी अग्रिम, मोटारकार अग्रिम, वैयक्तिक संगणक अग्रिम मंजूर केले असेल आणि त्या संदर्भातील मूळ अग्रिम अथवा व्याजाची वसूली सुरु असेल तर दर महिन्याच्या वेतनातून ती वसूल करुन त्या रकमा श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना अग्रिम मंजूरीच्या आदेशात नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सहायक संचालक (लेखा), मुंबई यांच्यामार्फत जमा करण्यात येईल.

**(२०) प्रतिनियुक्तीवर असताना रजेवरुन अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर नियुक्ती :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) ह्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत रजेवर गेल्या किंवा प्रशिक्षणासाठी गेल्या आणि ते धारण करीत असलेल्या पदावर अन्य अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात आली आणि रजेवर अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर त्यांची नियुक्ती अन्य पदावर करण्यात आली तर रजावेतन, वेतन, पदग्रहण अवधी, सक्तीचा खोळंबा कालावधी इत्यादीबाबत सर्व खर्च, रजा समाप्तीच्या अथवा प्रशिक्षण समाप्तीच्या दिनांकापासून ते अन्य पदाचा कार्यभार धारण करेपर्यंतच्या दिनांकापर्यंत महिला आर्थिक विकास महामंडळ सोसेल.

**(२१) निवासी शिपायाऐवजी रोख भत्ता :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) ह्या प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वी त्यांना निवासी शिपायाऐवजी रोख भत्ता अनुज्ञेय असल्यास किंवा अधिकाऱ्यांना निवासी शिपायाऐवजी रोख भत्ता अनुज्ञेय असल्यास त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्याच दराने निवासी रोख भत्ता अनुज्ञेय असेल, मात्र असा भत्ता घेण्यापूर्वी दरमहा निवासी शिपाई देण्यात आलेला नाही असे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

**(२२) शासनाने वेळोवेळी विहित केलेले नियम लागू करणे :-** श्रीमती श्रध्दा जोशी (भारतीय राजस्व सेवा) यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत शासन वेळोवेळी जे नियम करील किंवा जे कार्यकारी आदेश निर्गमित केले जातील, ते नियम / कार्यकारी आदेश लागू असतील.

**(२३) प्रतिनियुक्तीच्या कालावधीत देशात/ परदेशात प्रवास :-** महिला व बाल विकास विभागांतर्गत महिला आर्थिक विकास महामंडळामध्ये प्रतिनियुक्तीवर असताना, विभागाच्या कामासंबंधात महिला व बाल विकास विभाग प्रमुखांच्या सहमतीने देशात कोठेही प्रसावा करावयाचा झाल्यास शासनाच्या पूर्वपरवानगीची आवश्यकता असणार नाही. मात्र, महिला व बाल विकास विभागाच्या कामाच्या संबंधात परदेशी जावयाचे असल्यास, अथवा खाजगी कामांसाठी परदेशी जावयाचे असल्यास, शासनाची पूर्वपरवानगी आवश्यक असेल.

**(२४) विहित अटी शर्तीमध्ये समाविष्ट नसलेल्या अटी / शर्तींबाबत :-** वर नमूद केलेल्या अटी / शर्तीमध्ये समाविष्ट नसलेल्या विशिष्ट अटी / शर्तींबाबत केंद्रीय नागरी सेवा संवर्गातील अधिका-यांना जे नियम, विनियम आणि कार्यकारी आदेश लागू असतील ते नियम, विनियम व कार्यकारी आदेश लागू असतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१२९१५१६२३६३३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women and Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, serialNumber=f9bd2a7c214922f8f4939e80711ece461c9dfd9c679b28f98e79475c5ea90e21, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2019.01.29 15:27:02 +05'30'

**(स्मिता निवतकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
३. मा.अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. मा.अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) / (लेखा परिक्षा), मुंबई.
६. अतिरिक्त संचालक, Directorate of G.S.T. Intelligence, Mumbai Zonal Unit, मुंबई
७. श्रीमती श्रीमती श्रध्दा जोशी, व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
८. महासंचालक, Directorate of G.S.T. Intelligence, नवी दिल्ली
९. अध्यक्ष, Central Board of Indirect Taxes & Customs, नवी दिल्ली
१०. सदस्य (आस्थापना), Central Board of Indirect Taxes & Customs, नवी दिल्ली
११. निवासी लेखाधिकारी, बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रा (पू.), मुंबई
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३. निवड नस्ती, का-१०.